**माहितीचा अधिकार अधिनियम, २००५**
**नागरिकांना अवलोकनासाठी अभिलेख**
**उपलब्ध करुन देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्र. संकीर्ण२०१८/प्र.क्र.४५/कार्या-६**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई ४००० ०३२**
**दिनांक : २६ नोव्हेंबर, २०१८**

**प्रस्तावना:-**

माहितीचा अधिकार अधिनियम, २००५ अंतर्गत प्राप्त होणा-या माहिती अर्जांची संख्या कमी होण्याच्या दृष्टीने व कामकाजात पारदर्शकता येण्यासाठी पुणे महानगरपालिकेने जावक क्र. मआ/से/१०६२, दिनांक ३१.७.२००९च्या आदेशान्वये, नागरिकांना अवलोकनासाठी अभिलेख उपलब्ध करुन देण्याचा प्रयोग केला होता. त्याच धर्तीवर जिल्हास्तरीय कार्यालयापासून ते निम्नस्तरीय सर्व कार्यालयात नागरिकांना अवलोकनासाठी अभिलेख उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक:-**

शासकीय कामकाजात अधिक पारदर्शकता येण्यासाठी व माहिती अधिकार अधिनियमांतर्गत प्राप्त माहिती अर्जांची, प्रथम व द्वितीय अपीलांची संख्या कमी होण्याच्या दृष्टीने राज्यातील जिल्हा स्तरीय कार्यालयांपासून ते निम्नस्तरीय सर्व कार्यालयात तसेच महानगरपालिका, नगरपालिका, जिल्हा परिषद इत्यादी सर्व कार्यालयात प्रत्येक सोमवारी किंवा सदर दिवशी सार्वजनिक सुट्टी असल्यास त्यानंतरच्या कार्यालयीन दिवशी दुपारी ३.०० ते ५.०० या वेळेत नागरिकांना, माहिती अधिकार अधिनियम, २००५ अंतर्गत विहित प्रक्रियेनुसार, त्यांच्या मागणीनुसार अभिलेख अवलोकनासाठी उपलब्ध करुन द्यावेत.

२. प्रत्येक कार्यालय प्रमुखांनी स्थानिक परिस्थितीच्या अनुषंगाने आवश्यक दुरुस्तीसह नागरिकांना अभिलेख अवलोकनासाठी उपलब्ध करुन देण्याच्या प्रयोगाची आपापल्या कार्यालयात अंमलबजावणी करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१८११२६१५२८३५३७०७ असा आहे. हे परिपत्रक डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BIPIN MALLICK

Digitally signed by BIPIN MALLICK
DN: c=IN, o=Personal, postalCode=110021, st=Delhi, 2.5.4.20=851b304bef2c7712cf25db5dfc449b43f1be8ed9746214431839058754ee9d6c, serialNumber=5c1e5899a9e90706d681aa81bf2b35173a431909d439a2c63e7c0e76d6d83e30, cn=BIPIN MALLICK
Date: 2018.11.26 15:40:55 +05'30'

**(बिपिन मल्लिक)**
**अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
४. राज्य मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. सर्व राज्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. प्रबंधक (मूळ शाखा/ अपील शाखा), उच्च न्यायालय, मुंबई
७. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
८. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
९. प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१०.अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव(सर्व), मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
११.महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई
१२.सर्व मंत्रालयीन विभाग
१३.सर्व विभागीय आयुक्त / सर्व जिल्हाधिकारी
१४.महासंचालक, यशदा, पुणे